केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत सन २०१९-२० वर्षातील दुसऱ्या हप्त्यापोटी प्राप्त निधी व समरुप राज्य हिस्सा निधी सन २०२०-२१ मध्ये वितरीत करण्याबाबत.
(केंद्र हिस्सा - २५०१ २९६२),
(राज्य हिस्सा - २५०१ २७९३ ),

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२०/प्र.क्र.०८/कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : - २० नोव्हेंबर, २०२०.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वि. वि, क्र.अर्थसं-२०२० / प्र.क्र.६४ / अर्थ-३, दि. १६.०४.२०२०.
२) वि. वि, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२० /प्र.क्र.६५ / अर्थ-३, दि.०४.०५.२०२०
३) केंद्र शासन, ग्राम विकास मंत्रालय यांचे पत्र क्र. NO.J-१२०२५/०१/२०२०-RL (NRLM__१२C), दि.१०.०४.२०१९.
४) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२०/प्र.क्र.८/कार्या-६, दि.१३.७.२०२०.
५) ग्राम विकास विभागाची नस्ती क्र.मजिअ-२०२०/ प्र.क्र.६८/ यो-३.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १६ एप्रिल, २०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. तसेच संदर्भाधिन क्र. २ अन्वये वित्त विभागाने कार्यक्रमांतर्गत योजनांच्या ३३ टक्के मर्यादेत खर्चासाठी नियोजनात्मक सूचना केलेल्या आहेत. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ग्राम विकास विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत (NRLM) अनुसूचित जमाती घटकासाठी सन २०१९-२० या मागील वर्षातील प्रलंबित केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिश्श्याची ३३ टक्के तरतूद संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेली आहेत. प्रकरणी मागील वर्षातील प्रलंबित राज्य हिस्सा रु.१३.४९ कोटी तसेच सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केंद्र हिस्सा रु.४६.६८ कोटी व समरुप राज्य हिस्सा रु.३१.१२ कोटी वितरीत करण्याबाबत ग्राम विकास विभागाकडून संदर्भाधीन क्र.५ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २५०१ - ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम यामधील राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी (TSP) सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी प्रथम हप्त्यात प्राप्त केंद्र हिस्सा रु.४६६८.०५ लाख वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर

योजनेंतर्गत राज्य हिश्श्याकरीता अर्थसंकल्पित तरतुदीच्या ३३ टक्के मर्यादेत उपलब्ध तरतुदींमधून सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील प्रलंबित राज्य हिस्सा रु.१३४९.९१३ लाख व सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी राज्य हिस्सा रु.२२०.२६ लाख असा एकूण १५७०.१७३ लाख इतका निधी वितरीत व खर्च करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :- **(रु लाखात)**

| अ.क्र. | योजनेचे नाव व लेखाशिर्ष | सन २१-२०२० अर्थसंकल्पीय तरतूद | दि १३.७.२०२०.च्या शा . नि. अन्वये यापूर्वी वितरीत केलेला निधी | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान (केंद्र हिस्सा) (२५०१ २९६२) | १०७१०.०० | ३२०३.९१० | ४६६८.०५० |
| २ | राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान (राज्य हिस्सा) (२५०१ २७९३) | ७१४०.०० | ७८६.०२७ | १५७०.१७३ |
| | **एकूण** | **१७८५०.००** | **३९८९.९३७** | **६२३८.२२३** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु. ६२३८.२२३ ( अक्षरी बासष्ट कोटी अडतीस लाख बावीस हजार तीनशे फक्त ) निधी प्रशासकीय प्रमुख म्हणून अप्पर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात तथापि, आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रात मात्र वैयक्तिक लाभाच्याच योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २१४०/व्यय-१४, दि.१९.१०.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११७१७४०१०४२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.11.20 17:23:07 +05'30'

**किरण कि. पवार**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.

४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

५. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

६. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.

७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

०९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१०. ग्रामविकास विभाग, योजना- ०३, मंत्रालय, मुंबई.

११. कार्यासन अधिकारी, (का. २/१७/ )/निवड नस्ती (का.६),आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.